**सन २०१३-१४ मध्ये शासकीय वाहन क्र. MH - 31-A- 9852 च्या दुरूस्तीसाठी झालेल्या अधिकच्या खर्चास कार्योत्तर मंजुरी प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र.वाहन २०१५ /प्र.क्र. १३० /फ-५**
मंत्रालय,मंबई - ४०० ०३२
दिनांक - २० मे २०१५.

<u>वाचा</u> - १. अपर प्रधान मुख्य वन संरक्षक (संसाधन उपयोग) महाराष्ट्र राज्य ,नागपुर यांचे पत्र क्र.कक्ष - ८/ भांडार / लेखा/प्र.क्र.८३ (१४.१५)/जी -१४८/२०१४-१५ दिनांक ३१.०३.२०१५ .
२. शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र.एमएससी २०११/प्र.क्र.१८२/फ-५ दिनांक ३०.०९.२०११

**<u>प्रस्तावना -</u>**

सन २०१३-१४ मध्ये मुख्य वन संरक्षक (प्रादेशिक) नागपुर यांचे शासकीय पेट्रोल वाहन क्र. MH -31-A- 9852 या वाहनाच्या रू.६४,३३१ /- इतका खर्च झाला आहे. सदर वाहनाच्या दुरूस्तीवर प्रादेशिक कार्यालय प्रमुख यांना प्रदान करण्यात आलेल्या मर्यादेपेक्षा जास्त खर्च झाला असल्यामुळे अतिरीक्त खर्चास कार्योत्तर मंजुरी प्रदान करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाला आहे.

मुख्य वन संरक्षक (प्रादेशिक) नागपुर यांच्या अधिनस्त क्षेत्रात नागपुर,वर्धा,भंडारा व गोंदिया या चार वन विभागाचा समावेश असून ,सदर विभागातील वनक्षेत्राचे व वन्यजीवांचे प्रभाविरित्या संरक्षण व व्यवस्थापन करणे हे प्रमुख कार्य आहे.त्याअनुषंगाने त्यांना सदर क्षेत्रात नियमित दौरे करारवे लागतात.सदरचे दौऱ्यात शासकीय पेट्रोल वाहन क्र. MH -31-A- 9852 या वाहनाचा नियमित वापर होतो.जंगलातील खडकाळ रस्त्यामुळे टायरची झिज होत असल्याने व नियमित सर्व्हिसिंग करणे गरजे असते.ही बाब विचारात घेऊन अपर प्रधान मुख्य वन संरक्षक (संसाधन उपयोग) महाराष्ट्र राज्य ,नागपुर यांनी प्रस्तावित केल्यानुसार मुख्य वन संरक्षक (प्रादेशिक) नागपुर यांच्या कार्यालयातील शासकीय वाहन क्र. MH -31-A- 9852 या वाहनाच्या दुरूस्तीवर झालेल्या अतिरीक्त खर्चास मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

शासन निर्णय संदर्भ क्र. २ दिनांक ३०.९.२०११ नुसार प्रादेशिक कार्यालय प्रमुख / विभाग प्रमुख यांना पेट्रोल चालणाऱ्या मोटार वाहनाच्या दुरूस्तीसाठी प्रती वाहन प्रतिवर्ष रूपये ६०,०००/- इतक्या खर्चास मंजुरी देण्याचे अधिकार प्रदान करण्यात आले असून त्यापेक्षा जास्त झालेल्या खर्चास मंजूरी देण्याचे पुर्ण अधिकार प्रशासनिक विभागास आहेत.

मुख्य वन संरक्षक (प्रादेशिक) नागपुर यांनी शासकीय पेट्रोल वाहन क्र. MH -31-A- 9852 या वाहनाच्या रू.६४,३३१ /- इतका खर्च केला असल्यामुळे वित्तीय अधिकाराचे उल्लंघन झाले आहे.

सदर वाहनाची माहिती व दुरूस्तीवर झालेला खर्च तसेच आता पर्यत मंजुर करण्यात आलेली रक्कम याबाबतचा तपशिल खालील प्रमाणे आहे.

| वाहन क्रमांक | वाहनाचा प्रकार | दुरूस्तीचे वर्ष | वर्षभरात एकुण झालेला दुरूस्ती खर्च | वनसंरक्षक,वाहतूक व विपणन, बल्लारशाह यांनी त्यांच्या अधिकारात मंजुर केलेली रक्कम | कार्योत्तर मंजुरीसाठी उर्वरीत रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| MH -31-A-9852 | कार | २०१३-१४ | रू.६४,३३१ | रू.६०,००० | रू.४,३३१ |

शासन निर्णय संदर्भ क्रमांक -२ अन्वये प्रशासकीय विभाग प्रमुखांना प्रदान करण्यात आलेल्या आदेशानुसार मुख्य वन संरक्षक (प्रादेशिक) नागपुर यांनी शासकीय पेट्रोल वाहन क्र. MH -31-A- 9852 या वाहनाच्या दुरूस्तीवर केलेला अतिरीक्त खर्च रू.४,३३१ या शासनाची कार्योत्तर मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५२०१३५२१९२५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Uvais Mohammed Farooqui

Digitally signed by Uvais Mohammed Farooqui
DN: CN = Uvais Mohammed Farooqui, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2015.05.20 13:53:21 +05'30'

**(डॉ.यु.एम.फारूकी)**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रत-**

१.प्रधान मुख्य वन संरक्षक (वन बल प्रमुख) ,महाराष्ट्र राज्य,नागपुर.
२. प्रधान मुख्य वन संरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन) ,महाराष्ट्र राज्य,नागपुर.
३. प्रधान मुख्य वन संरक्षक (संसाधन उपयोग) ,महाराष्ट्र राज्य,नागपुर.
४. मुख्य वन संरक्षक(प्रादेशिक) ,नागपुर
५. जिल्हा कोषागार अधिकारी ,नागपुर
६. महालेखापाल १/२ (लेखापरिक्षा) ,महाराष्ट्र राज्य,मुंबई / नागपुर
७. निवडनस्ती फ-५.